**"स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव" या एकछत्री योजनेतंर्गत, "३५० वा शिवराज्याभिषेक सोहळा" या महोत्सवाच्या निमित्ताने, "छत्रपती शिवाजी महाराजांची निवडक दुर्मिळ पत्रे" हे पुस्तक स्वरूपात (कॉफीटेबल बुक) प्रकाशित करण्यासाठी येणा-या खर्चास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मपुवि २०२३/प्र.क्र.१५४/सां.का.२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०२ ऑगस्ट, २०२३.

**वाचा**: संचालक, पुराभिलेख संचालनालय यांचे जा.क्र. पुरा.संचा/प्रकाशन/छशिमदुप/ २०२३/बी -२०३३,दि.२०.०७.२०२३ चे पत्र

**प्रस्तावना:-**

छत्रपती शिवाजी महाराजांच्या राज्याभिषेकाचे ३५० वे वर्ष असल्याने वर्षभर विविध कार्यक्रमांचे आयोजन करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. त्याप्रित्यर्थ कार्यक्रमाची आखणी करण्यासाठी दिनांक १५ जुलै, २०२३ रोजी मा.मंत्री(सांस्कृतिक कार्य) यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या बैठकीत पुराभिलेख संचालनालय, मुंबई या कार्यालयामार्फत "छत्रपती शिवाजी महाराजांची दुर्मिळ पत्रे " पुस्तक स्वरूपात प्रकाशित करण्याचे व त्याकरीता रू.२५.०० लाख इतका निधी देण्याचे निर्देशित केले आहे. त्यानुषंगाने संचालक, पुराभिलेख संचालनालय यांचेकडून उपरोक्त संदर्भाधीन पत्रान्वये, प्रस्ताव शासनास मान्यतेसाठी सादर केला आहे.

**शासन निर्णय :-**

"स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव" या एकछत्री योजनेतंर्गत, "३५० वा शिवराज्याभिषेक सोहळा" या महोत्सवाच्या निमित्ताने, छत्रपती शिवाजी महाराजांच्या कागदपत्रांचा अमूल्य ठेवा इतिहास संशोधक, अभ्यासक व सर्वसामान्य जनतेला ज्ञात व्हावा म्हणून **"छत्रपती शिवाजी महाराजांची निवडक दुर्मिळ पत्रे"** पुस्तक रूपाने (कॉफी टेबल बुक) पुराभिलेख संचालनालय, मुंबई या कार्यालयामार्फत प्रकाशित करण्यासाठी येणाऱ्या रू.२५,००,०००/- (अक्षरी रूपये पंचवीस लक्ष फक्त) इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**०२.** संचालक,पुराभिलेख संचालनालय,मुंबई यांना यासाठी नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास या संबधीच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

**०.३** यासाठी होणारा खर्च मागणी क्रमांक "झेडडी-२, प्रधान लेखाशिर्ष २२०५ कला व संस्कृती (१३) स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव (१३) (०१) स्वातंत्र्याचा अमृत महोत्सवांतर्गत कार्यक्रम (कार्यक्रम) (२२०५ ३७३३), ५०- इतर खर्च" या लेखाशिर्षाखालील सन २०२३-२४ या आर्थिक वर्षातील उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा.

**०४.** सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या, वि.अ.प्र.-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-दोन, दिनांक १७ एप्रिल, २०१५ या शासन निर्णयातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-एक, उपविभाग तीन, अ.क्र.४, परिच्छेद २७ (२) (अ) नुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**०५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२३०८०२१२१२१५७५२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIDYA HEMANT WAGHMARE

Digitally signed by VIDYA HEMANT WAGHMARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=4e214bf8a250420c28c2084d8dd965c0d454568322bd41981d48971712e51795, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F93EFE7B946BF26FF989D6E5E01E1B122B9EB4E3E4E6799CB8E82B2D33D58DFC, cn=VIDYA HEMANT WAGHMARE
Date: 2023.08.02 12:14:05 +05'30'

**( विद्या वाघमारे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री तथा वित्त मंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता), मुंबई
७. उप सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
८. उप सचिव (व्यय-१५), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१०. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
११. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई
१२. उप सचिव/ कक्ष अधिकारी(अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. अवर सचिव (सां.का.४), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. संचालक,पुराभिलेख संचालनालय,मुंबई.
१५. निवड नस्ती, सां.का.२